ज्येष्ठ नागरिकांसाठी शरद शतम आरोग्य कवच विमा योजना लागू करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय क्र.: ज्येष्ठना-२०२१/प्र.क्र.१४२/सामासु**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- २१ सप्टेंबर, २०२१

**प्रस्तावना:**

ज्येष्ठ नागरिकांच्या विविध सामाजिक, आर्थिक, आरोग्य, निवास व सुरक्षा विषयक समस्यांची सोडवणूक करणे अत्यंत आवश्यक आहे. आधुनिक राहणीमानाचा ज्येष्ठ नागरिकांवर अतिशय ताण पडत आहे. आरोग्य व इतर गरजा भागविण्यासाठी आर्थिक परिस्थितीशी त्यांना सामना करणे भाग पडत आहे. ज्येष्ठ नागरिकांच्या वेळोवेळी आरोग्य तपासण्या न करता आल्यामुळे त्यांचे विविध आजार अगदी शेवटच्या टप्प्यात लक्षात येतात. परिणामी उपचार घेण्यास विलंब होतो व दुर्दैवाने रूग्ण दगावण्याचा धोका असतो, ही बाब लक्षात घेऊन राज्यातील ज्येष्ठ नागरिकांसाठी शरद शतम आरोग्य कवच विमा योजना सुरू करण्याचे प्रस्तावित आहे. सदर योजनेंर्तगत ज्येष्ठ नागरिकांकरिता प्रस्तावित करावयाच्या विविध चाचण्या/तपासण्या, सॉफ्टवेअर प्रणाली, ज्येष्ठ नागरिकाची नोंदणी करणे, तसेच या योजनेचे आरोग्य विभागाच्या विविध योजनांसमवेत अभिसरण इत्यादी बाबीसंदर्भात शिफारस करणेसाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

६५ वर्षावरील ज्येष्ठ नागरिकांसाठी शरद शतम आरोग्य कवच विमा योजना राबविण्याच्या अनुषंगाने सदर योजनेंर्तगत नोंदणी, विविध चाचण्या/तपासणी, सॉफ्टवेअर प्रणाली, योजनेची कार्यपध्दती तसेच आरोग्य विभागाच्या विविध योजनांसमवेत अभिसरण इत्यादी बाबीसंदर्भात शिफारस करणेसाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र | सदस्याचे नाव | पदनाम | अध्यक्ष / सदस्य |
|---|---|---|---|
| १. | श्री. सुधाकर शिंदे | मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई | अध्यक्ष |
| २. | श्रीमती रूबल अग्रवाल | आयुक्त एकात्मिक बाल विकास सेवा | सदस्य |
| ३. | डॉ.सतिश पवार | अतिरिक्त संचालक, NUHM, मुंबई | सदस्य |
| ४. | डॉ.अजय चंदनवाले | उप संचालक, DMER, मुंबई. | सदस्य |
| ५. | डॉ.विनायक सावर्डेकर | जे.जे.रूग्णालय, मुंबई | सदस्य |
| ६. | श्री. प्रशांत नारनवरे | आयुक्त, समाजकल्याण, पुणे | सदस्य |
| ७. | उप सचिव (आस्थापना) | उप सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय मुंबई | सदस्य |
| ८. | उप सचिव (आस्थापना) | उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय मुंबई | सदस्य |

२. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहिल.

१. ज्येष्ठ नागरिकांकरिता आवश्यक असलेल्या विविध चाचण्यांबाबत शिफारशी करणे

२. या योजनेअंतर्गत आशा वर्कर व अंगणवाडी सेविका यांच्यामार्फत सर्वेक्षण करणेबाबतच्या कार्यपध्दतीबाबत शिफारस करावी.

३. या योजनेतील ज्येष्ठ नागरिकांची तपासणी करण्यात आल्यानंतर त्याबाबतचा अहवाल संबंधीत ज्येष्ठ नागरिकांना प्राप्त होण्याबाबत व त्यात आजार आढळल्यास निदान करणेबाबत तसेच आरोग्य विभागाच्या व इतर योजनेमध्ये अभिसरण करण्याची कार्यपध्दतीबाबत शिफारस करण्यात यावी.

४. या योजनेच्या सविस्तर कार्यपध्दतीबाबत शिफारस करणे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२१०९२२१२०४१०६७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Rajesh Sadashiv Manjrekar

Digitally signed by Rajesh Sadashiv Manjrekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, serialNumber=7e57add6a85f0cf35923f0f015d8e4d4d3a72ec43ad6008f036a3ab06aa1bb85, cn=Rajesh Sadashiv Manjrekar
Date: 2021.09.22 12:06:54 +05'30'

**(रा. स. मांजरेकर)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव

२) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहाय्यक

३) मा. श्री. अरविंद कुमार, अपर मुख्य सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई.

४) मा. श्री. प्रदीपकुमार व्यास, अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

५) उप सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

६) उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

७) श्री. प्रशांत नारनवरे, मा. आयुक्त, समाजकल्याण, पुणे

८) श्री. सुधाकर शिंदे, मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई

९) डॉ. पद्यमजा जोगेवार, सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

१०) श्री. शिवदास धुळे, उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

११) श्री. बापूराव भवाने, मा.आयुक्त प्रतिनिधी, महिला व बाल विकास, कोकण विभाग

१२) उप सचिव (सामासु), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग , मंत्रालय, मुंबई

१३) निवड नस्ती, सामासू.